**उद्योगांचे सामाजिक दायित्व (CSR) अंतर्गत प्राप्त निधीतून कोविड-१९ च्या उपाययोजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२१/प्र.क्र. ७९/आव्यप्र-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २५ जानेवारी, २०२२

संदर्भ :- १) शासनाचे समक्रमांकाचा दि. ८ एप्रिल, २०२१ रोजीचा शासन निर्णय.
२) महाआयटी कॉर्पोरेशनचे दि. २१ सप्टेंबर, २०२१ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना —**

संदर्भाधिन शासन निर्णयान्वये महा-आयटी कॉर्पोरेशनला कोविड-१९ संदर्भात करावयाच्या उपाययोजनांसाठी महाआयटी कॉर्पोरेशन उपलब्ध करुन दिलेल्या संपर्कासंदर्भात (Communication-SMS Service) तसेच इतर ऑनलाईन ॲपसाठी Cloud Service उपलब्ध करुन दिली. त्यासाठी महा-आयटी कॉर्पोरेशला रु. ५० लक्ष उपलब्ध करुन देण्यात आले होते. आता संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये उपलब्ध करुन दिलेल्या रु. ५० लाखापैकी रु. ४७ लाख तरतूद वापरण्यात आली असून (दि. २१ सप्टेंबर, २०२१ पर्यंत) आता रु. ७५ लाखाची उपलब्ध करुन देण्याबाबत मागणी केलेली आहे. आपत्ती व्यवस्थापन प्रभागामध्ये कोविड-१९ च्या अनुषंगाने करावयाच्या उपाययोजनांबाबत विभागाने महा-आयटीची मदत घेवून वेगवेगळे ॲप तयार केले आहेत. सदर ॲपच्या मदतीने कोविड-१९ विषाणू प्रादुर्भावावर उपाययोजना सुव्यवस्थितरित्या होण्यासाठी तसेच त्यावर शासनाचे संनियंत्रण ठेवण्याच्या दृष्टीने वेगवेगळे ॲप महाआयटी प्राधिकरणाकडून तयार करण्यात आले. त्यात RT-PCR चाचणीची विश्वासार्हता, युनिव्हर्सल पास इ. साठी SMS सेवा व Cloud सेवा महा-आयटीकडून उपलब्ध करून देण्यात आली. यासाठी माहे मार्च, २०२२ पर्यंत लागणाऱ्या खर्चाची रक्कम महा-आयटी प्राधिकरणास देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णय —**

कोविड-१९ च्या प्रतिबंधात्मक उपायोजना सुरु असून यापुढेही महाआयटी प्राधिकरणाच्या मदतीने खालील कार्यक्रम सुरु ठेवणे आवश्यक आहे.

1. Application development for Covid -19 notification on Mobile and Web and management of its infrastructure on cloud.
2. Bulk SMS service.
3. Management of cloud infrastructure for Universal Pass system.

4. L1- Support for Universal Pass.

दि. १६.०४.२०२० च्या अधिसूचनेव्दारे आपत्ती सौम्यीकरणासाठी उद्योगांचे सामाजिक दायित्व (CSR) अंतर्गत राज्य आपत्ती व्यवस्थापनास देणगी स्विकारण्यासाठी स्वतंत्र बचत खाते उघडण्यात आले. सदर खात्यातील निधी प्राधिकरणाच्या मान्यतेने खर्च करावयाचा असल्याने प्राधिकरणाचे अध्यक्ष तथा मा. मुख्यमंत्री यांच्या मान्यतेने महाआयटी प्राधिकरण, मुंबई (Maharashtra Information Technology Corporation Ltd) यांना रू.७५,०००,००/- (रुपये पंचाहत्तर लक्ष फक्त) निधी RTGS द्वारे वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

उदयोगांचे सामाजिक दायित्व (CSR) मधून उपलब्ध करण्यात आलेला निधी शासन अधिसूचना दि. १६.०४.२०२० मध्ये नमूद केल्याप्रमाणे या खात्यातून होणारा खर्च शासनाच्या प्रचलित नियम व कार्यपध्दतीनूसार करण्यात यावा. झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्या सांकेतांक क्र. २०२२०१२५११४८५६५०१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(हितेंद्र दुफारे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत -

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) व्यवस्थापकीय संचालक, महा-आयटी कर्पोरेशन, मुंबई.
६) वित्तीय सल्लागार व सह सचिव, मदत व पुनर्वसन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती (कार्यासन-आव्यप्र-१)